**जाती प्रमाणपत्र देण्याची कार्यपद्धती**

(१) अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील व्यक्तींना द्यावयाची जातीचे प्रमाणपत्रे.

(२) महाराष्ट्र राज्यातील सवलती घेताना इतर मागास वर्ग, भटक्या जमाती, धनगर व तत्सम जाती (क) व वंजारी व तत्सम जाती (ड) यांना उन्नत व प्रगत गटात ( **Creamy Layer** ) मोडत नसल्यासह जातीचे प्रमाणपत्र देणे.

(३) केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याची इतर मागास वर्गाची जी यादी घोषित केलेली आहे त्या यादीत नमूद असलेल्या जातीतील व्यक्तींना केंद्र शासनाच्या नियंत्रणाखालील पदाकरिता अर्ज करताना त्यासोबत सादर करावयाचे जातीचे प्रमाणपत्र [उन्नत व प्रगत गटात (**Creamy Layer**) मध्ये मोडत नसल्यास]

**महाराष्ट्र शासन**

**समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक सीबीसी. १०९६/प्र.क्र.४८/मावक–५

मंत्रालय विस्तार भवन; मुंबई ४०० ०३२

दिनांक ३ जून १९९६.

वाचा :– (१) मुंबई राज्य परिपत्रक, पॉलिटिकल अँन्ड सर्विसेस डिपार्टमेंट क्र. ४९०/४६ दिनांक ३० एप्रिल १९५३.

(२) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १४७५/४२०/डी–५, दिनांक २३ सप्टेंबर १९७५.

(३) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १४७५/१९६८९/डी–५, दिनांक १५ ऑक्टोबर १९७५.

(४) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १४७६/११०२७/डी–५, दिनांक ५ मे १९७६.

(५) शासन पत्र, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. २१७७/डी–५, दिनांक १५ जानेवारी १९७७.

(६) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०७७/५०८७६/डी–५, दिनांक २१ मार्च १९७९.

(७) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्र. सीबीसी. १६८२/५८५५३/(८९२)/कार्यासन–५, दिनांक २९ जानेवारी १९८३.

(८) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८३/३०४८०/(१२५४)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक १७ ऑक्टोबर १९८५.

(९) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८४/४४५७७/(१८१३)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक १ नोव्हेंबर १९८५.

(१०) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८४/७४९३२/(२०८३)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक ५ डिसेंबर १९८५.

(११) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८३/यु. ओ. ५६२/(१८७३)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक २७ डिसेंबर १९८५.

(१२) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८३/यु. ओ. ५६२/(१८७३)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक २१ जानेवारी १९८६.

(१३) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १६८४/गोप. ५९२/(१९९९)/बीसीडब्ल्यु–५, दिनांक १९ फेब्रुवारी १९७६.

(१४) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १५८४/७१७५१/[illegible]/सीडीकल्यु–५, दिनांक १८ एप्रिल १९८६.

(१५) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०८५/२६३०४/([illegible])/सीडीकल्यु–५, दिनांक ६ ऑक्टोबर १९८६.

(१६) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १६८६/१४६५८/([illegible])/मावक–५, दिनांक १ एप्रिल १९८७.

(१७) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग क्र. सीबीसी. १०९०/२१३४८/([illegible])/मावक–५, दिनांक ८ नोव्हेंबर १९९०.

(१८) शासन परिपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी. १०९४/प्र.क्र. ४४८३/प्र. ८५/मावक–५, दिनांक १९ एप्रिल १९९४.

(१९) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी. १०९४/प्र.क्र. ८६ मावक–५, दिनांक १६ जून १९९४.

(२०) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी. १०९४/प्र.क्र. ८६/मावक–५, दिनांक २२ जून १९९४.

(२१) शासन शुद्धीपत्रक, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी. १०९४/प्र.क्र. ८६/मावक–५, दिनांक २६ जुलै १९९४.

(२२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र. सीबीसी. १४९४/प्र.क्र. २३६/मावक–५, दिनांक १३ जून १९९५.

(२३) सहसचिव, कल्याण मंत्रालय, केंद्र शासन, नवी दिल्ली यांचे अ.शा. पत्र क्र. १२०१८/७३/९५–एससीडी/आरसेल, दिनांक २५ सप्टेंबर १९९५.

**प्रस्तावना :–** सर्वोच्च न्यायालयाने विशेष अनुज्ञा याचिका क्र. १४७६७/९३ सिव्हील अर्ज क्र. ५८५४/९४ कु. माधुरी पाटील विरुद्ध अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे व इतर यावर दिनांक २ सप्टेंबर १९९४ रोजी असा निर्णय दिला आहे की, प्रत्येक राज्याने जातीची प्रमाणपत्रे निर्गमित करण्याची कार्यपद्धती सर्वोच्च न्यायालयाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार विहित करण्यात यावी. सर्वोच्च न्यायालयाने उपरोक्त अनुज्ञा याचिकेच्या निर्णयामध्ये घालुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना व केंद्रीय कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या प्रस्तावनेतील क्र. २३ येथील दिनांक २५ सप्टेंबर १९९५ च्या पत्रान्वये केलेल्या सूचना विचारात घेऊन वरीलप्रमाणे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना जातीची प्रमाणपत्रे निर्गमित करण्याबाबत विहित केलेल्या कार्यपद्धतीत सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :–** संदर्भीय शासन निर्णय/परिपत्रकान्वये अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना जातीची प्रमाणपत्रे निर्गमित करण्याच्या विहित केलेल्या कार्यपद्धतीत फेरबदल करून शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :–

अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना जातीची प्रमाणपत्रे ह्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट " अ " मध्ये नमूद केलेल्या सूचनानुसार निर्गमित करावीत.

(१) अनुसूचित जातीच्या व्यक्तींना द्यावयाच्या जातीच्या प्रमाणपत्राचा नमुना परिशिष्ट " ब "

(२) विमुक्त जाती व भटक्या जमाती (जानेवारी १९९० पूर्वीच्या) यांना द्यावयाच्या जातीच्या प्रमाणपत्राचा नमुना परिशिष्ट " क ".

(३) महाराष्ट्रातील सवलती घेताना इतर मागासवर्ग, भटक्या जमाती, धनगर व तत्सम (क) व वंजारी व तत्सम (ड) यांना द्यावयाच्या जाती प्रमाणपत्राचा नमुना परिशिष्ट " ड ".

(४) विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींना द्यावयाचा जाती प्रमाणपत्राचा नमुना परिशिष्ट " इ ".

(५) केंद्र शासनाने तयार केलेल्या महाराष्ट्र राज्याशी संबंधित असलेल्या इतर मागास वर्गीयांच्या (महाराष्ट्र राज्याच्या इतर मागासवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील ज्या जातीचा समावेश आहे अशा जाती) यादीत समाविष्ट असलेल्या जातीच्या व्यक्तींना केंद्र शासनाच्या आरक्षणाचा लाभ घेण्यासाठी सादर करावयाच्या प्रमाणपत्राचा नमुना परिशिष्ट " ई ".

(२) खाली नमूद केलेल्या प्राधिकाऱ्यांना अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील जातीच्या व्यक्तींना जातीचे प्रमाणपत्र निर्गमित करण्यासाठी सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे ज्या जातींना प्रगत व उन्नत गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र सादर करावे लागते त्यांना असे प्रमाणपत्र निर्गमित करण्यासाठी देखील सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

(१) संबंधित उप विभागीय अधिकारी (महसूल)

(२) उप जिल्हाधिकारी, किंवा

(३) जिल्हाधिकारी.

संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी प्रशासकीयदृष्ट्या प्रमाणपत्राच्या कामाची वाटणी उप जिल्हाधिकारी व उप विभागीय अधिकारी (महसूल) यांच्यामध्ये करावी.

(३) महाराष्ट्र राज्याच्या सवलती घेताना इतर मागासवर्ग, भटक्या जमाती-धनगर व तत्सम (क), भटक्या जमाती-वंजारी व तत्सम (ड) यांनी जातीचा दाखला व उन्नत व प्रगत गटात (Creamy Layer) मोडत नसल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्याकरिता सादर करावयाच्या अर्जाचा नमुना परिशिष्ट '' फ ''.

(४) केंद्र शासनाच्या आरक्षणाचा लाभ घेण्याकरिता जातीचा दाखला मिळण्यासाठी ज्या नमुन्यात अर्ज सादर करावयाचा तो नमुना परिशिष्ट '' ग ''.

(५) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील नसूनही त्या व्यक्तीस अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागासप्रवर्गातील असल्याचे जातीचे प्रमाणपत्र देण्यात आले आहे याबद्दलच्या कोणत्याही तक्रारीची जाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ज्या क्षेत्रातील असेल ती जाती प्रमाणपत्र तपासणी समिती संबंधित दक्षता पथकामार्फत अशा तक्रारीची चौकशी करील व अशी तक्रार प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून त्यावर ६ महिन्याच्या आत निर्णय घेईल. याबाबत जाती प्रमाणपत्र तपासणी समितीचा निर्णय अंतिम राहील.

(६) अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींनी जातीची प्रमाणपत्रे निर्गमित करण्याबाबतचे यापूर्वी निर्गमित केलेले सर्व आदेश एकत्रित करून अद्ययावत सूचना सोबत जोडल्या आहेत.

(७) वरील आदेश तात्काळ लागू करण्यात येत आहेत तसेच या आदेशाचे व सूचनांचे अनुपालन काटेकोरपणे करण्याबाबतची दक्षता सर्व सक्षम प्राधिकाऱ्यांनी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स. नु. गावीत,
कक्ष अधिकारी.

प्रति :

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
सर्व विभागीय आयुक्त
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व मंत्रालयीन विभाग
त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्याबाबतच्या सूचना द्याव्यात.
सर्व जिल्हा दंडाधिकारी
सर्व उपविभागीय अधिकारी (महसूल)
सर्व उपजिल्हाधिकारी
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी
सर्व कार्यासने, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, व क्रीडा विभाग/निवड नस्ती का. मावक-५.

* पत्राद्वारे

## परिशिष्ट " अ "

**खालील प्रवर्गातील जातींना जातींची प्रमाणपत्रे व उन्नत आणि प्रगत गटास (क्रिमी लेअर) मोडत नसल्याची प्रमाणपत्रे देण्याची कार्यपद्धती**

(१) अनुसुचित जाती, १४ विमुक्त जाती व जानेवारी १९९० पूर्वीच्या भटक्या जमाती व विशेष मागासप्रवर्ग यांना जातीची प्रमाणपत्र देणे.

(२) महाराष्ट्रातील इतर मागासवर्ग, भटक्या जमाती, धनगर (क), बंजारी (ड) यांना जातीचे प्रमाणपत्र व उन्नत व प्रगत गटात (क्रिमी लेअर) गटात मोडत नसल्याचे प्रमाणपत्र.

(३) केंद्र शासनाची महाराष्ट्र राज्याशी संबंधित इतर मागासवर्गीयांची जी यादी आहे त्या यादीतील व्यक्तींना जातीची प्रमाणपत्रे व उन्नत व प्रगत गटात/(क्रिमी लेअर) मोडत नसल्याचे प्रमाणपत्र देण्याबाबत.

(१) ज्या व्यक्तीस किंवा आई-वडिलांना/पालकांना त्यांच्या पाल्यास जाती प्रमाणपत्राची आवश्यकता असेल त्यांनी खालीलपैकी कोणत्याही प्राधिकाऱ्याकडे विहित केलेल्या नमुन्यात लेखी अर्ज करावा :–

(अ) संबंधित उप विभागीय अधिकारी (महसूल).

(ब) उप जिल्हाधिकारी, किंवा

(क) संबंधित जिल्हाधिकारी.

जिल्हाधिकाऱ्यांनी प्रशासकीय दृष्ट्या पमाणपत्राच्या कामाची वाटणी उप जिल्हाधिकारी आणि उप विभागीय अधिकारी (महसूल) यांच्यामध्ये करावी.

(२) अर्जदाराने अर्जात खरी माहिती दिली आहे व ती माहिती खोटी असल्याचे नंतर आढळुन आल्यास इंडियन पिनल कोडमधील कलम १९९व २०० मधील तरतुदीनुसार शिक्षेस पात्र राहील असे अर्जदारांनी अर्जात स्पष्टपणे नमूद केले पाहिजे.

(३) अर्जदार हा संबंधित गावाचा रहिवासी आहे असे त्यांनी अर्जात स्पष्टपणे नमूद केले पाहिजे व त्याबद्दलचा कागदोपत्री पुरावा सादर केला पाहिजे. तसेच अर्जदार किंवा आई-वडिल किंवा पालक यांनी प्रतिज्ञापत्र लेखी सादर करावे, की ज्या प्रतिज्ञापत्रामध्ये रहिवासाचे मुळ ठिकाण, जात, उपजात याचा तपशील असावा व सदरहू प्रतिज्ञा पत्र राजपत्रित अधिकारी किंवा अराजपत्रित अधिकारी यांच्या सही शिक्क्यानिशी साक्षांकित केलेले असावे. प्रतिज्ञापत्रात जातीच्या दाव्याबाबत ज्या पुराव्याचा उल्लेख केला आहे ती जोडण्यात यावीत. उदा शाळा सोडल्याचा दाखला (प्राथमिक, माध्यमिक) तलाठ्याचा दाखला, सरपंचाचा दाखला किंवा त्या गावातील शहरातील प्रतिष्ठित व्यक्तीने, व्यक्तीच्या जातीबाबत प्रमाणित केलेला दाखला.

(४) अर्जदार हा अर्जात नमूद केलेल्या जातीचाच आहे ह्याबाबत त्याने सबळ पुरावा सादर केला पाहिजे.

(५) अर्जदाराने एखादा सक्षम अधिकाऱ्याकडे जातीच्या प्रमाणपत्रासाठी पूर्वी अर्ज केला असेल किंवा सक्षम अधिकाऱ्याने (महाराष्ट्रातील किंवा इतर राज्यातील) त्यास जातीचे प्रमाणपत्र दिलेले असेल तर त्याबाबतचा स्पष्ट उल्लेख अर्जामध्ये करावयास पाहिजे व अशा प्रमाणपत्राची सत्यप्रत अर्जासोबत जोडली पाहिजे.

(६) सर्वसाधारणपणे जातीची नोंद शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्रात केलेली असते. अर्जदाराने सादर केलेल्या कागदोपत्री पुराव्यावरून अर्जदार हा तो शिकत असलेल्या शेवटच्या शाळेच्या (विशेषतः प्राथमिक शाळेच्या) शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्रात नमूद केलेल्या जातीचाच आहे अशी सक्षम अधिकाऱ्यांची खात्री झाली तर अर्जदारास जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे.

(७) सक्षम प्राधिकाऱ्यांनी अर्जदाराने केलेल्या जातीच्या दाव्याची काळजीपूर्वक छाननी करावी.

(८) सक्षम प्राधिकाऱ्यांनी अर्जदाराच्या नातेवाईकांच्या जातीच्या नोंदी महसुली नोंद वहीत किंवा जन्म व मृत्यू नोंदवहीत आढळत असतील तर तशी कागदपत्रे पहावीत.

(९) ज्या जाती/समाजाची संघटना सोसायटी ॲक्ट किंवा सार्वजनिक न्यास अधिनिमांतर्गत नोंदणीकृत झालेली आहे. त्या समाजाच्या/जातीच्या संघटनेकडून सादर केलेले प्रमाणपत्र.

(१०) सक्षम प्राधिकाऱ्यांनी त्यांना आवश्यकता भासल्यास गृह चौकशी करावी किंवा महसूल यंत्रणेमार्फत चौकशी करण्यात यावी.

(११) अर्जदाराचे वडील किंवा इतर जवळचे नातेवाईक शासकीय-किंवा तत्सम सेवांत असतील किंवा पूर्वी असतील तर त्यांच्या सेवापुस्तकातील जात व कायम रहवासाचे ठिकाण या संबंधीच्या नोंदींची सत्यप्रत अर्जदाराने अर्जासोबत जोडली पाहिजे.

(१२) सक्षम प्राधिकाऱ्यांच्या अधिकार क्षेत्रामध्ये ज्यांचे कायम वास्तव्य आहे अशा अर्जदाराला जातीचे प्रमाणपत्र देण्याचा अधिकार आहे. अनुसूचित जातीच्या व्यक्तींना परिशिष्ट " ब " मधील नमुन्यात जाती प्रमाणपत्र देताना परिच्छेद १ व ३ ठेवण्यात यावा व परिच्छेद २ वगळण्यात यावा. कायम रहिवास म्हणजे जो रहिवास सेवा, नोकरी, शिक्षण व कारावास इत्यादी कारणाकरिता नसलेला रहिवास.

(१३) जे स्थलांतरीत अनुसुचित जातीपैकी आहेत त्यांना त्या राज्यातील सक्षम प्राधिकाऱ्यांनी जातीचे प्रमाणपत्र देताना अर्जदाराच्या वडीलांना त्यांच्या मूळच्या राज्यातील सक्षम प्राधिकाऱ्यांनी जे जातीचे प्रमाणपत्र दिले असेल ते सादर केल्यास त्या आधारे स्थलांतरितांना द्यावयाच्या जातीच्या प्रमाणपत्राच्या

नमुन्यात जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे. ज्या ठिकाणी सखोल चौकशी त्यांच्या मुळच्या राज्यात करावयाची आहे अशी प्रकरणे वगळली आहेत. स्थलांतरितांना जातीचे प्रमाणपत्र देताना भारत सरकार गृह मंत्रालय, यांच्या दिनांक ६ ऑगस्ट १९८४ चे पत्र क्र. बीसी १६०१४/१/८२-एससीएनबीसीडी-१ व दिनांक २२ फेब्रुवारी १९८५ चे पत्र क्र. बीसी १६०१४/१/८२-एससीएनबीसीडी-१ मधील पत्रात ज्या सूचना दिलेल्या आहेत त्यांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांना जातीचे प्रमाणपत्र देताना परिशिष्ट " ब " मधील नमुन्यातून परिच्छेद १ व २ ठेवावे व परिच्छेद-३ वगळण्यात यावा.

(१४) महाराष्ट्र राज्याच्या अनुसूचित जातीच्या यादीमध्ये ज्या जातीची नोंद आहे अशा जातीतील ज्या व्यक्तीचे कायम वास्तव्य महाराष्ट्र राज्य हे आहे त्यांना सूचना क्र. १२ मध्ये नमूद केलेल्या सूचनानुसार जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे. भारत सरकार, गृह मंत्रालय, यांचे पत्र क्र. बीसी-१२०२५/२/७६/एससीटी-१, दिनांक २२ मार्च १९७७ मध्ये नमूद केलेल्या सूचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

(१५) महाराष्ट्र राज्यातील सवलती घेण्याकरिता इतर मागासवर्ग, भटक्या जमाती, धनगर व तत्सम जाती (क) वंजारी व तत्सम जाती (ड) यांना जातीचे प्रमाणपत्र उन्नत व प्रगत गटात (क्रिमी लेअर) मोडत नसल्याचे प्रमाणपत्र शासन निर्णय क्र. सीबीसी १०९४/प्र.क्र.८६/मावक-५, दिनांक १६ जून १९९४, दिनांक २२ जून १९९४ व शुद्धीपत्र दिनांक २६ जुलै १९९४ मध्ये नमूद केलेल्या निकष व अटींची पूर्तता करून घेऊन देण्यात यावीत.

(१६) केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याची जी इतर मागासवर्गीयांची यादी घोषित केलेली आहे त्या यादीतील जातीच्या व्यक्तींना केंद्र शासनाच्या नियंत्रणाखालील पदाकरिता अर्ज करावयाचा असल्यास त्याकरिता प्रमाणपत्राचा जो नमूना ज्यामध्ये उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याबाबतचा उल्लेख आढळतो ते प्राप्त करून घेण्याकरिता ज्या अटी व शर्ती भारत सरकार, मिनिस्ट्री ऑफ पर्सोनल पब्लिक ग्रिव्हन्स ॲन्ड पेन्शन (डिपार्टमेंट ऑफ पर्सोनल ॲन्ड ट्रेनिंग) यांचे पत्र क्र. ३६०१२/२२/९३-इएसटीटी (एससीटी) दिनांक ८ सप्टेंबर १९९३ यांच्या कार्यालयीन ज्ञापनात नमूद केलेल्या आहेत. त्यांचे पालन करून विहित नमुन्यात प्रमाणपत्र देण्यात यावे.

(१७) जाती प्रमाणपत्राच्या नमुन्याच्या प्रती कार्यालयाने छापून घ्याव्यात. अशासकीय संस्थांनी किंवा व्यक्तींनी छापलेले नमूने कोणत्याही परिस्थितीत उपयोगात आणण्यात येऊ नयेत. संबंधित कार्यालयाने प्रमाणपत्रात अनुक्रमांक नमूद करावा व तो ठळक असावा.

(१८) जातीचे वर्गीकरण व जात अचूक असावी. महाराष्ट्र राज्याकरिता असलेली अनुसूचित जातीची यादी केंद्र शासनाने भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३४१ व त्यानुसार काढलेल्या अध्यादेश १९ प्रमाणे विहित करण्यात आली आहे. केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्याशी संबंधित सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्या मागासलेल्या वर्गाची (इ.मा.व.) यादी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचा निर्णय क्र. १२०११/६८/९३-बीसीसी(सी) दिनांक १० सप्टेंबर १९९३ अन्वये प्रसिद्ध केलेली आहे.

(१९) महाराष्ट्रातील इतर मागासवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील जाती वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय व परिपत्रकाद्वारे प्रसिद्ध केलेल्या आहेत.

(२०) जी व्यक्ती अनुसूचित जातीची असल्याचा दावा करते तिचा धर्म हिंदू किंवा शीख किंवा बौद्धधर्म असू शकतो.

(२१) इतर मागासवर्गामध्ये समाविष्ट असलेल्या जातींना कोणतेही धार्मिक बंधन घालण्यात आलेले नाही. विमुक्त जाती व भटक्या जमातीचा असल्याचा दावा केल्यास त्यांचा धर्म हिंदू किंवा शीख असू शकतो. तसेच मुस्लिम धर्मियांपैकी ज्या पोट जाती विमुक्त जाती/भटक्या जमातीमध्ये समाविष्ट आहेत: त्यांचा धर्म मुस्लिम असू शकतो.

(२२) अनुसूचित जातीतून ख्रिस्ती धर्म स्विकारलेल्यांचा समावेश इतर मागासवर्गात केलेला आहे त्यांना जातीचे प्रमाणपत्र देतांना ते ख्रिस्ती धर्म स्वीकारण्यापूर्वी अनुसूचित जातीचे होते असे ते ज्या चर्चच्या कार्यक्षेत्रात रहातात त्या चर्च प्रमुखाकडून प्रमाणित करून घ्यावे.

(२३) (१) जी व्यक्ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी स्थलांतरित होते तेव्हा ती व्यक्ती ज्या राज्यातील मागासवर्गीय आहे त्या राज्यामध्ये ती मागासवर्गीय म्हणून दावा करू शकते. स्थलांतरित झालेल्या राज्यात तो दावा करता येणार नाही.

(२) खालील दोन प्रवर्गातील व्यक्तींना " स्थलांतरीत " म्हणून जाती प्रमाणपत्र देण्याच्या उद्देशाकरिता विचारात घ्यावयाचे आहे.

(अ) ज्या व्यक्तीची जात मागासवर्गीय म्हणून अनुसूचित झाली आहे. (अनु. जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग) ती जात महाराष्ट्र राज्यात व इतर राज्यात आढळून येते परंतु अशा व्यक्तीचे कायम वास्तव्याचे ठिकाण हे घटना आदेशाच्या किंवा शासन निर्णयाच्या दिनांकाला ती व्यक्ती किंवा त्याचे वडील, पणजोबा हे महाराष्ट्र राज्याच्या बाहेरील रहिवासी आहेत.

(ब) ज्या व्यक्तीची जात मागासवर्गीय म्हणून (अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग) महाराष्ट्र राज्या व्यतिरिक्त इतर राज्यात व केंद्रशासित प्रदेशात अनुसूचित झाली आहे.

(३) घटना आदेश व शासन निर्णय निर्गमित झाला आहे त्या दिनांकाला ज्या ठिकाणी जी व्यक्ती रहात आहे तो रहिवास मागासवर्ग म्हणून दर्जा प्राप्त होण्यासाठी आवश्यक असतो. जी व्यक्ती या घटना आदेशाच्या किंवा शासन निर्णयाच्या नंतर जन्माला आली असेल तर त्या व्यक्तीला त्यांचे वडील घटना आदेशाला व शासन निर्णयाला ज्या ठिकाणी राहत असतील त्या ठिकाणचे वास्तव्य त्या व्यक्तीला कायम वास्तव्याचे ठिकाण म्हणून प्राप्त होईल.

(४) अर्जदार महाराष्ट्र राज्याचा सर्वसाधारण रहिवाशी असेल तर अनुसूचित जातीपैकी असल्यास १० ऑगस्ट १९५० या तारखेस आणि विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग, विशेष मागास प्रवर्ग या प्रवर्गातील असल्यास ज्या शासकीय आदेशान्वये अर्जदाराची जात विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग म्हणून घोषित करण्यात आली असेल त्या तारखेस संबंधित अर्जदाराचे किंवा अर्जदाराचा जन्म या तारखेनंतर झाला असेल तर त्यांच्या वडीलांचे कायम वास्तव्य ज्या ठिकाणी होते त्या क्षेत्राशी संबंधित असलेल्या सक्षम प्राधिकारी त्या अर्जदारास जाती प्रमाणपत्र देण्यास सक्षम आहे.

(२४) जातीचा दाखला देताना सक्षम प्राधिकाऱ्यांनी जातीच्या दाखल्यात पुढील बाबी स्पष्टपणे नमूद कराव्यात :-

(अ) जातीच्या दाखल्यामध्ये जात स्पष्टपणे लिहिलेली असावी ती संक्षेपात्मक असू नये.

(ब) जातीचे वर्गीकरण जसे अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग सुद्धा स्पष्टपणे नमूद करावे.

(क) जातीचे प्रमाणपत्र निर्धारित नमुन्यात असावे.

(ड) प्रमाणपत्रामध्ये ज्या शासकीय आदेशान्वये जी जात मागासवर्गीयांच्या यादीत समाविष्ट करण्यात आली असेल त्या आदेशाचा क्रमांक व दिनांक नमूद करावा आणि ती व्यक्ती सक्षम प्राधिकाऱ्याच्या कार्यक्षेत्रात सर्वसाधारण रहिवाशी असल्याचा उल्लेख असावा.

(२५) इतर मागासवर्गीयांच्या यादीत समाविष्ट असलेल्या मुख्य जातीच्या स्पष्ट संदर्भ असेल तरच सक्षम प्राधिकाऱ्यांनी अशा पोट जातीच्या तत्सम जातीच्या लोकांना मुख्य जातीची प्रमाणपत्रे द्यावीत. उदा. इतर मागासवर्गीयांच्या यादीत कुणबी जातीचा समावेश आहे. एखाद्या व्यक्तीच्या कागदोपत्री तिलोरी कुणबी किंवा खैरे कुणबी असा शब्द प्रयोग असेल तरच कुणबी ही जात मागासवर्गीयांच्या यादीत असल्याने व ती मुख्य जात असल्याने त्या व्यक्तीस कुणबी जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावे. निव्वळ तिलोरी, खैरे यासारखी नावे असल्यास अशा व्यक्तीस जातीचे प्रमाणपत्र देता येणार नाही. कारण तिलोरी, खैरे यासारखी नावावरून मुख्य जात स्पष्ट होत नाही.

(२६) लेवा कुणबी, लेवा पाटील, लेवा पटीदार या जातींच्या व्यक्तीबाबत शासन परिपत्रक समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक : सीबीसी–१०९५/८३१/प्र.क्र. १००/मावक-५, दिनांक १५ सप्टेंबर १९९५ मध्ये केलेल्या स्पष्टीकरणानुसार जातीची प्रमाणपत्रे दिली जातील.

(२७) कुरूड या जातीच्या व्यक्तींना प्रमाणपत्र देताना शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा विभाग क्रमांक सीबीसी-१४९३/प्र.क्र.२१०/मावक-५, दिनांक ९ नोव्हेंबर १९९५ मध्ये केलेल्या खुलाशानुसार जातीची प्रमाणपत्रे द्यावीत.

(२८) मुस्लीम जातीच्या व्यक्तींना जातीचे प्रमाणपत्र देताना शासन पत्र समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा विभाग क्रमांक सीबीसी-१०९५/प्र.क्र./२२६/मावक-५, दिनांक १९ ऑक्टोबर १९९५ सोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे द्यावे.

(२९) अर्जदाराने अनुसूचित जातीचे प्रमाणपत्र मिळावे यासाठी अर्ज केला असल्यास त्यांच्या वडीलांचे प्रमाणपत्र अनुसूचित जातीचे असेल परंतु अर्जदाराच्या कागदोपत्री नवबौद्ध किंवा अनुसूचित जातीमधून ख्रिश्चन धर्मात धर्मांतरीत असे नमूद केले असल्यास भारत सरकार गृह मंत्रालय यांच्या दिनांक २ मे १९७५ च्या परिपत्रक क्रमांक ३५/१/७२/आरयु/एससीटी-५, मध्ये नमूद केलेल्या बाबींची पूर्तता करून घेऊन अशा अर्जदारास त्यांच्या स्वतःच्या कागदपत्राच्या आधारावर अनुसूचित जातीचे किंवा इतर मागासवर्गीय म्हणून प्रमाणपत्र देण्यात यावे.

(३०) एका जिल्ह्यातून दुसऱ्या जिल्ह्यात शिक्षण, नोकरी वगैरे निमित्त स्थलांतरीत होणाऱ्या अनुसूचित जातीच्या व्यक्तीस त्या राज्याच्या संदर्भात अनुसूचित जातीचे समजता येते. तथापि ज्या जातीच्या संदर्भात क्षेत्र बंधन आहे त्या जातीच्या व्यक्तीला त्या विशिष्ट क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून जातीचे प्रमाणपत्र घ्यावे लागेल. म्हणजेच अनुसूचित जातीच्या व्यक्तीचे सर्वसाधारण रहीवासाचे ठिकाण क्षेत्र बंधन असलेल्या क्षेत्रात असेल आणि ती व्यक्ती त्याच राज्याच्या दुसऱ्या जिल्ह्यात नोकरी, शिक्षण वगैरे निमित्त स्थलांतरीत होत असेल तर त्या व्यक्तीला त्यांच्या मूळ जिल्ह्यातून जातीचे प्रमाणपत्र आणावे लागेल. परंतु त्या व्यक्तीने त्यांच्या वडीलांच्या सर्वसाधारण रहिवास असलेल्या जिल्ह्याच्या सक्षम अधिकाऱ्याकडून त्यांच्या वडिलांस मिळालेले जातीचे प्रमाणपत्र सादर केल्यास त्या व्यक्तीला ज्या जिल्ह्यात स्थलांतरीत झाला असेल त्या जिल्ह्याच्या अधिकाऱ्याकडून प्रमाणपत्र घेता येईल.

(३१) महाराष्ट्र राज्याच्या सवलतीकरिता इतर मागासवर्गीयांच्या यादीत मुख्य जाती दर्शविण्यात आल्या आहेत त्या जातीच्या उपजातींनासुद्धा जाती प्रमाणपत्रासाठी पात्र ठरविले आहे. त्या पोटजातीच्या उपजातीच्या व्यक्तीस मुख्य जातीचे नावाने जातीचे प्रमाणपत्र देण्यात यावेत.

(३२) सक्षम प्राधिकाऱ्यांनी जातीच्या प्रमाणपत्रावर अन्य कोणताही शिक्का न मारता उप विभागीय अधिकारी, उपजिल्हाधिकारी किंवा जिल्हाधिकारी असा शिक्का मारून जातीचे प्रमाणपत्र दिले नसल्यास ते वैद्य समजले जाणार नाही.

(३३) एखादी जात मागासवर्गीयांच्या यादीत समाविष्ट आहे किंवा नाही, ती जात मागासवर्गीयांच्या यादीत समाविष्ट असलेल्या जातीची तत्सम जात पोटजात किंवा उपजात आहे किंवा नाही याबाबत किंवा अशा तऱ्हेची शंका असल्यास अशा प्रकरणात संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेण्यात यावा.

(३४) जातीच्या प्रमाणपत्राकरिता अर्ज मिळाल्यापासून आठव्या दिवशी निकाली काढला पाहिजे. अर्जावर निर्णय देण्यापूर्वी अर्जदाराने अर्जासोबत जोडलेल्या कागदपत्राच्या सत्यप्रती सक्षम प्राधिकाऱ्यांनी मूळ कागदपत्राबरोबर तपासून पाहिल्या पाहिजेत.

(३५) अर्ज मान्य केला किंवा नाकारला त्याची कारणे, पुरावे व निर्णय स्पष्टपणे नमूद केली पाहिजे. अर्जदाराने अर्जात दिलेल्या जातीच्या खरेपणाबद्दल सक्षम प्राधिकाऱ्याची खात्री झाली नसेल तर अर्ज नाकारण्यात यावा व अर्ज नाकारण्याची कारणे अर्जदारास कळविण्यात यावीत. नाकारण्यात आलेल्या अर्जासंबंधी कोणत्याही प्राधिकाऱ्यांकडे दावा किंवा अपील करता येणार नाही.

(३६) एखादी व्यक्ती अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागास प्रवर्ग ह्या प्रवर्गातील नसूनही त्या व्यक्तीस अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्गीय व विशेष मागासप्रवर्गाचे असल्याचे प्रमाणपत्र दिलेले आहे. याबद्दलच्या कोणत्याही तक्रारीची जाती प्रमाणपत्र तपासणी समिती ज्या क्षेत्रातील असेल ती समिती संबंधित दक्षता पथकामार्फत तक्रारीची चौकशी करील व अशी तक्रार आल्यापासून सहा महिन्याचे आत त्यावर निर्णय देईल. तपासणी समितीने दिलेला निर्णय अंतिम राहील. सदरहू निर्णय ज्या सक्षम अधिकाऱ्याने जातीचे प्रमाणपत्र दिले आहे त्यास कळविण्यात येईल. सक्षम अधिकारी संबंधित प्रमाणपत्र रद्द करण्याची कार्यवाही तात्काळ करील तसेच संबंधित अर्जदाराविरुद्ध उचित कारवाई देखील करील.

(३७) ज्या सक्षम प्राधिकाऱ्याने एखाद्या व्यक्तीस ती विशिष्ट जातीची नसताना देखील त्या विशिष्ट जातीचे प्रमाणपत्र दिले आहे असे चौकशीअंती आढळून आले तर त्या प्राधिकाऱ्याला महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९७९ लागू असतील त्यानुसार त्यांच्यावर कारवाई करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी कारवाई करतील. याशिवाय फौजदारी खटला देखील सक्षम प्राधिकारी त्यांचेवर भरू शकतील.

(शा.म.मु.) एच ६३३–३ (५,०००––७–९६)

परिशिष्ट "ब"

**Form of certificate to be produced by a candidate belonging to a Scheduled Caste in support of his claim**

**FORM OF CASTE CERTIFICATE**

This is to certify that Shri/Shrimati/Kumari * ..............................

son/daughter * of. ..............................

**To be retained in both the cases i. e. while issuing the Caste Certificate to B.Cs. belonging to this State as well as to the "Migrantas".**

of village/town * ..............................

in District/Division * ..............................

of the State/Union Territory * ..............................

belongstothe ..............................

Caste/Tribe * which is recognised as a Scheduled Caste/Scheduled Tribe * under :

# The Constitution (Scheduled Castes) Order, 1950.

# The Constitution (Scheduled Tribes) Order, 1950.

# The Constitution (Scheduled Castes) (Union Territories) Order, 1961.

# The Constitution (Scheduled Tribes) (Union Territories) Order, 1951.

[As amended by the Scheduled Castes and Scheduled Tribes Lists (Modification) Order, 1956 the Bombay Reorganisation Act, 1960, the Punjab Reorganisation Ad, 1966, the State of Himachal Pradesh Act, 1976, the North Eastern Areas (Reorganisation) Act, 1971 and the Scheduled Castes and Scheduled Tribes Orders (Amendment) Act, 1976].

# The Constitution (Jammu & Kashmir) Scheduled Castes Order, 1956.

# The Constitution (Andaman and Nicobar Islands) Scheduled Tribes Order, 1959 as amended by the Scheduled Castes and Scheduled Tribes Orders (Amendment) Act, 1976.

# The Constitution (Dadra and Nagar Haveli) Scheduled Castes Order, 1962.

# The Constitution (Dadra and Nagar Haveli) Scheduled Tribes Order, 1962.

# The Constitution (Pondicherry) Scheduled Castes Order, 1964.

# The Constitution (Scheduled Tribes) (Uttar Pradesh) Order, 1967.

# The Constitution (Goa, Daman & Diu) Scheduled Castes Order, 1968.

# The Constitution (Goa, Daman & Diu) Scheduled Tribes Order, 1968.

# The Constitution (Nagaland) Scheduled Tribes Order, 1870.

# The Constitution (Sikkim) Scheduled Castes Order, 1978.

# The Constitution (Sikkim) Scheduled Tribes Order, 1978.

Applicable to Migrants only.

† 2. Applicable in the case of Scheduled Castes/Scheduled Tribes persons who have migrated from one State/Union Territory Administration.

This certiificate is issued on the basis of the Scheduled Caste/Scheduled Tribe Certificate issued to

Shri/Shrimati * ..........................................................

Father/Mother of Shri/Shrimati/Kumari * ..........................................

of Village/Town * ..........................................................

in District/Division * ......................................................

of the State/Union Territory * ..............................................

who belong to the ..........................................................

caste/tribe * Which is recognised as a Scheduled Caste/Scheduled Tribe in the State/Union Territory * .......................... issued by the ..........................

(Name of prescribed authority) vide their No. ...................................

dated ........................

Not applicable to Migrants.

† 3. Shri/Shrimati/Kumari * ............................... and of * his/her family ordinarily resides (s) in Village/town * ........................................

of ..................................................... District / Division *

of the State/Union Territory * of ............................................

Signature ..............................

Designation ............................

(with Seal of office)

Place : ........................ State/Union Territory

Date : ........................

---

* Please delete the words which are not appliable,
\# Please quote specific Presidential Order.
† Delete the paragraph which is not applicable.
*Note* :— The term "Ordinarily reside (s)" used here will have the same meaning as in Section 20 of the Representation of the Peoples Act, 1950.

एच ६३३–३अ

परिशिष्ट "क"

**Form of Certificate to be issued to Vimukta Jati/Nomadic Tribes (excluding Dhangar and Vanjari and their synonyms)**
**Persons belonging to the State of Maharashtra**

Documents Verified (1)

(2)

(3)

(4)

CASTE **CERTIFIGATE**

This is to *certify* that Shri/Shrimati/Kumari * ..............................................
Son/daughter * of ...................................of village/town * ........................
in District/Division * .........................................................
of the State of Maharashtra belongs to the ..............................................
Caste/Tribe * Which *is* recognised a8 a Vimukta Jati/Nomadic Tribe * under Government Resolution † ............................................................ Department No. ............................... dated ................................ as amended from time to time.

2. Shri/Shrimati/Kumari * ...................................................
and/or his/her * family ordinarily reside (s) in village/town ......................................
.................of. ........................................ District/Division of the **State** of Maharashtra.

Signature ............................

Designation ............................

(with ***seal* of office)**

Place : ..........................

Date: ..........................

* Please delete the words which are not applicable,
† Please quote name of Department and specific number and date of Resoluton under which the caste/tribe has been recognised as Vimukta Jati/Nomadic Tribe by the Government *of* Maharashtra.

*Note :—* The term " Ordinarily reside (a) " used here will have the same meaning as in *Section 20* of the Representation of the Peoples *Act*, 1950.

## परिशिष्ट "ड"

**Form of Certificate to be produced by other Backward Classes, Nomadic Tribe (C) Dhangar and its synonyms and Nomadic Tribe (D) Vanjari and its synonyms**

This is to certify that Shri/Shrimati/Kumari ..................................................... .................................. son/daughter of ........................................ of Village/ District/Division .............................................................. in the ..................................... State. ........................................ belongs to the ....................................................... Caste/Community which is recognised as a Other Backward Class/Nomadic Tribe (C)/Nomadic Tribe (D) under the Government tesolution No. ................................................... dated ................................

Shri/Shrimati/Kumari ............................................................ and/or his/her family ordinarily reside (s) in the .............................................................. District/Division of the ............................ ..............State.

This is also to certify that hdshe does not belong to the persons/sections (Creamy Layer) Mentioned in the Schedule to the Government Resolution, Social Welfare, Cultural Affairs and Sports Department No. CBC. 1094/CR-86/BCW-V, dated 16th June, 1994

Signature .............................

Designation ............................

(with Seal of office)

Place : .........................

Date: .........................

---

*Note* :— The term "Ordinarily" used here will have the same meaning as in Section 20 of the Representation of the Peoples Act, 1950.

परिशिष्ट " इ "

**Form of Certificate to be issued to Special Backward Category Persons belonging to the State of Maharashtra**

Documents Verified (1)

(2)

(3)

(4)

CASTE CERTIFICATE

This is to certify that Shri/Shrimati/Kumari * ..................................................

Son/daughter * of ........................................ of Village/Town * ....................

in District/Division * ........................................................................ of the

State of Maharashtra belongs to the ................................................ caste which is

recognised as Special Backward Category under Government Resolution ..............................

Department No. ................................ dated .......................................... as amended

from time to time.

2. Shri/Shrimati/Kumari * ..........................................................................

and/or his/her * family ordinarily reside (s) in Village/Town ..........................................

.................................. of .................................. District/Division of the

State of Maharashtra.

Signature ..............................

Designation .............................

(with Seal of office)

Place : .........................

Date: .........................

---

* Please delete the words which are not applicable;

Note :— (a) The term " Ordinarily " used here will have the same meaning as in Section 20 of the Representation of the Peoples Act, 1950.

"ई"

**Form of Certificate to be produced by other Backward Classes applying for Appointment to Post under the Government of India**

This is to certify that ..................................................

Son of ........................................ Village ....................................

District/Division ................................ in the ........................................

belongs to the ........................................................ .Community which is recognised as a backward class under the Government of India Resolution No. 12012/68/93-BCC (C), dated the 10th September 1993 published in the Gazette of India, Extraordinary, Part-I, Section-1, No. 186, dated the 13th September 1993.

(ii) Government of India, Ministry of Welfare, Resolution No. 12011/9/94-BCC, dated 19th October 1994 published in Gazette of India, Extraordinary, Part-I Section I, No. 163, dated 20th October 1994.

(iii) Resolution No. 12011/7/95-BCC, dated the 24th May, 1995 in the Gazette of India, Extraordinary, Part-I, Section-I, No. 88, dated 25th May 1995.

Shri .................................................. and/or his/ family ordinarily reside (s) in the .......................................................... District/Division of the .............................................. State. This is also to certify that he/she does not belong to the persons/sections (Creamy Layer) mentioned in column 3 of the Scheduled to the Government of India, Department of Personnel & Training O.M. No. 36012/22/93-Esstt (Set), dated 8th Septeber 1993.

District Magistrate
Deputy Commissioner etc

Dated: .........................

Seal: .........................

---

*Note* :— (a) The term " Ordinarily " used here will have the same meaning as Section 29 of the Representation of the Peoples Act, 1950.

(b) Where the certificates are issued by Gazetted Officers of the Union Government or State Government, they should be in the same form but countersigned by the District Magistrate or Deputy Commissioner (Certificate issued by Gazetted Officers and attested by District Magistrate/ Deputy Commissioner are not sufficient.)

परिशिष्ट " क "

**Application form for a certificate for eligibility for reservation of job for other Backward Classes (including Nomadic Tribe (C) and Nomadic Tribe (D) in Maharashtra Government and semi Government Services.**

To,

______________________________

______________________________

______________________________

Sir,

I request that a certificate in respect of reservation for other Backward Classes/Nomadic Tribe (C)/ Nomadic Tribe (D) in Government and semi Government Services under Government of Maharashtrabe granted to me.

I give below the necessary particulars.

1. Full name of the applicant (in block letters) -
2. Date of birth
3. Complete Residential address—
   (a) Present
   (b) Permanent
4. Religion
5. Caste :
6. Sub-Caste :
7. Occupational Group
8. Serial Number of the caste in the State list of O.B.Cs. :
9. Name of Father :
10. Name of Mother
11. Name of Husband

12. Status of Parent (s)/Husband :

**(A) Constitutional posts**

**I. Designation** :

**(B) Government Services**

| | | Father | Mother | Husband |
|---|---|---|---|---|
| (i) Service (Central/State) | : | | | |
| (ii) Designation | : | | | |
| (iii) Scale of pay, including classification, if any. | : | | | |
| (iv) Date of appointment to the post | : | | | |
| (v) Age at the time of promotion to Class I post (if applicable). | : | | | |

**II. Employment in International Organisation e.g. UN, UNICEF, WHO**

(i) Name of Organisation :

(ii) Designation :

(iii) Period of service :

(Indicate date from .......................... to .................................. )

**III. Death/Permanent Incapacitation (Omit if not applicable)**

(i) Date of death/Permanent incapacitation putting an officer out of service. :

(ii) Details of permanent incapacitation. :

**(C) Employment in Public Sector Undertakings etc.**

(i) Name of Organisation :

(ii) Designation :

(iii) Date of appointment to the post. :

**(D) Armed Forces including para-military Forces**
(This will not include presons holding civil posts)

(i) Designation :

(ii) Scale of pay :

**(E) Professional Class (Other than those covered in item Nos. B & C and those engaged in trade, business and Industry.**

(i) Occupation/Profession.

**(F) PROPERTY OWNERS**

**(F) I. Agricultural Land Holding: Owned by mother, father and minor children**

(i) Location

(ii) Size of holding

(iii) (a) Irrigated (Type of irrigated land)

(i) :

(ii) :

(iii) :

(b) Unimgated :

to be certified by District Revenue Officer not lower than the rank of Tahsildar.

(iv) Percentage of irrigated land holding to statutory ceiling limit under State Land Ceiling Laws;

(v) If land holding is both irrigated/unirrigated total irrigated land holdings on the basis of conversion formula in State Land Ceiling Law.

(vi) Percentage of total irrigated land holding to statutory ceiling limit as per (iv).

**(F) II. Plantation :**

(i) Crops/Fruit

(ii) Location

(iii) Area of Plantation.

**(F) III. Vacant land and/or buildings in urban areas or urban agglomeration**

(i) Location of Property

(ii) Details of Property

(iii) Use to which it is put.

**(G) Income/Wealth**

(i) Annual family income from all sources (excluding salaries & "income from agricultural land).

(ii) Whether Tax Payer (Yes/No) (If yes a copy of the last three years return be furnished) :

(iii) Whether covered in Wealth Tax Act (Yes/No) (if so, furnish details)

**(H) Any other remarks.**

**(I)** **I certify** that the abovesaid particulars are **true to** the best of my knowledge and belief and that I do not **belong to the Creamy Layer of OBCs/N.T. (C)/N.T.** (D) and I am **eligible to be considered for posts reserved** for O B C's/N.T. (C)/N.T. (D). In the event of any information being found false or incorrect, or ineligibility **being** detected **before** or after the selection, I understand that my candidature/appointment is liable to be cancelled and I **shall** be liable to **such** further action as may be provided under the law and/or Rules.

Yours faithfully,

**Place :**

**Date :**

Signature of the candidate.

परिशिष्ट "ग"

APPLICATION FORM FOR A CERTIFICATE FOR ELIGIBILITY FOR RESERVATION OF JOBS FOR OTHER BACKWARD CLASSES IN C M L POSTS AND SERVICES UNDER GOVERNMENT OF INDIA

(This form, however should be used only as a model Additional items, if necessary, may be incorporated to suit to the local situation in the form)

To,

________________________

________________________

________________________

*Sir,*

I request that a certificate in respect of reservation for other Backward Classes in Civil Posts and Services under Government of India be granted to me.

I give below the necessary particulars :—

1. Full name of the applicant (in block letters)
2. Date of birth
3. Complete Residential address—
   (a) Present :
   (b) Parmanent
4. Religion :
5. Caste :
6. Sub-Caste :
7. Occupational Group
8. Serial Number of the Caste in the Central list of O.B.Cs.
9. Name of Father :
10. Name of Mother :
11. Name of Husband :

**12. Status** of Parent (s)/Husband

| | Father | Mother | Husband |
|---|---|---|---|

**(A) Constitutional posts**

**(I) Designation**

**(B) Government Services**

(i) Service (Central/State)

(ii) Designation

(iii) Scale of pay, including Classification, if any.

(iv) Date of appointment to the post. :

(v) Age at the time of promotion to Class I post (if applicable).

**II. Employment in International Organisation e.g. UN, UNICEF, WHO**

(i) Name of Organisation

(ii) Designation

(iii) Period of service

(Indicate date from ........................ to ................................ ..)

**III. Death/Permanent Incapacitation**
(Omit if not applicable)

(i) Date of death/Permanent incapacitation : putting an officer out of service.

(ii) Details of permanent incapacitation. :

**(C) Employment in public Sector Undertakings etc.**

(i) Name of Organisation

(ii) Designation

(iii) Date of appointment to the post.

**(D) Armed Forces including para-military Forces**
(This will not include persons holding civil posts)

(i) Designation

(ii) Scale of pay.

(E) Professional Class (Other than those covered in item Nos. B & C and those engaged in trade business and Industry

(i) Occupation/Profession

(F) PROPERTY OWNERS

**(F) I. Agricultural Land Holding : Owned by mother, father and minor children**

(i) Location

(ii) Size of holding

(iii) (a) Irrigated (Type of irrigated land) :

(i)

(ii)

(iii)

(b) Unirrigated

**to be certified by District Revenue Officer not lower than the rank of Tahsildar.**

(iv) Percentage of irrigated land holding to statutory ceiling limit under State land Celiling Laws;

(v) If land holding is both irrigated/unirrigated total irrigated land holdings on the basis of conversion formula in State Land Ceiling Law.

(vi) Pereentage of total irrigated land holding to statutory ceiling limit as per (iv).

(F) II. Plantation :

(i) Crops/Fruit

(ii) Location

(iii) Area of plantation

(F) III. Vacant: land and/or buildings in urban areas or urban agglomoration

(i) Location of Property

(ii) Details of Property

(iii) Use to which it is put

(G) Income/Wealth

(i) Annual familly income from all sources (excluding salaries & income from agricultural land).

(ii) whether Tax Payer (Yes/No) (If yes a copy of the last three years return be furnished)

(iii) whether covered in Wealth Tax : Act (Yes/No) (if so, furnish details)

**(H)** *Any* **other remarks.**

(I) I certify that the abovesaid particulars are true to the best of my knowledge and belief and that I do not belong to the Creamy Layer of OBCs and I am eligible to be considered for posts reserved for O B C's. In the event of any information being found false or incorrect, or ineligibility being detected before of after the selection, I understand that my candidature/ appointment is liable to be cancelled and I shall be liable to such further action as may be provided under the law and/or Rules.

Yours faithfully,

Place :

Date :

Signature of the candidate.